महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे नोव्हेंबर, २०२१ च्या वेतनासाठी रु.५७.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एसटीसी-१२२१/प्र.क्र.३६३/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०२१.

<u>संदर्भ :-</u>

१) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई पत्र क्र.रा.प./लेखा/अंववि/२३६७/, दि.३०.११.२०२१.
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/कोविड१९ रिक्षा चा./का-११/२०२१/जा.क्र.१२७३९, दि.०४.१०.२०२१.
३) शासन निर्णय क्र.एसटीसी-०४२१/प्र.क्र.६१/परि-२, दि.०७.०५.२०२१.

**<u>प्रस्तावना ;-</u>**

उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.१ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे नोव्हेंबर, २०२१ च्या वेतनासाठी रु.२००.०० कोटी इतकी रक्कम आस्कमिकता निधीमधून वितरीत करण्याची शासनास विनंती केली आहे. तसेच परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये "मागणी क्रमांक बी-३, २०४१, वाहनांवरील कर ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली रू.१०८.०० कोटी इतकी रक्कम संदर्भाधिन क्र.३ येथील दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार कोविड-१९ च्या पार्श्वभुमीवर राज्यातील रिक्षा चालक परवानाधारकांना एकवेळचे अर्थ सहाय्य म्हणून वितरित करण्यात आला होता. सदर रू.१०८.०० कोटी रक्कमेमधून रू.५७.०० कोटी इतकी शिल्लक रक्कम समर्पित करण्याबाबत संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये परिवहन आयुक्त कार्यालयाने विनंती केली आहे. परंतु, संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी व राज्य परिवहन महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित वेतनासाठी खर्च या दोन्ही बाबी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून एकाच (समान) लेखाशीर्षातून भागविण्यात येणार असल्याने शासनाने मंजूर केलेल्या रू.१०८ कोटी रक्कमेतून शिल्लक रू.५७.०० कोटी एवढी रक्कम समर्पित न करता, रा.प.महामंडळाच्या प्रलंबित वेतनासाठी वापरण्यास मंजूरी देण्यासाठी वित्त विभागास विनंती केली असता, वित्त विभागाने सदर निधी राज्य परिवहन महामंडळाच्या

कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी वितरित करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार प्रस्तुत निधी रा.प. महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे नोव्हेंबर, २०२१ च्या वेतनासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

रा.प. महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे नोव्हेंबर, २०२१ च्या वेतनासाठी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून रू.५७.०० कोटी (अक्षरी रूपये सत्तावण्ण कोटी फक्त) एवढी रक्कम रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रू.५७.०० कोटी हा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च "मागणी क्रमांक बी-३, २०४१, वाहनांवरील कर ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५०४/२०२१/व्यय-८, दि.२९.११.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२०८१३०८५२८०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MINAKSHI DEVIDAS KARHADE

Digitally signed by MINAKSHI DEVIDAS KARHADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT(TRANSPORT), postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0ea81113f6df694c04d4b835d0f3328844e438498d9d1d7bcfcc2bf1f5abf98a, pseudonym=3ECC0123EF2E9557142DB57330C5E392065C2897, serialNumber=64757C0F2E9C5E56362BC8E7A79ABEE993C28EBD3D21BC22D37A4D8E12AD1CB3, cn=MINAKSHI DEVIDAS KARHADE
Date: 2021.12.08 13:13:23 +05'30'

**( मिनाक्षी कऱ्हाडे )**

**कक्ष अधिकारी, गृह (परिवहन) विभाग,**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
५. मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई

७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
९. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
१०.मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१२.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१४.वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१५.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१६.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
१७. निवडनस्ती/परि १.